असा. क्र. ४३ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५



# महाराष्ट्र शासन राजपत्र

असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

रविवार, ऑगस्ट १४, २००५/श्रावण २३, शके १९२७

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.

---

### अनुक्रमणिका



दिनांक ९ ऑगस्ट २००५ रोजी राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी याद्वारे प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**अ. मा. शिंदेकर,**
सचिव, महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

### सन २००५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३५.

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर "**महाराष्ट्र शासन राजपत्रात**" दिनांक १४ ऑगस्ट २००५ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

### मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ यात आणखी सुधारणा करण्यासाठी अधिनियम.

**ज्याअर्थी,** नृत्याविष्कार (dance performance) आयोजित करण्यासाठी, पोलीस आयुक्त, जिल्हा दंडाधिकारी आणि इतर विवक्षित अधिकारी यांनी नृत्याविष्कार लायसने प्रदान केली आहेत ;

**आणि ज्याअर्थी,** ही नृत्याविष्कार लायसने प्रदान करण्यामागील उद्देश, सार्वजनिक मनोरंजनासाठी असे नृत्याविष्कार आयोजित करणे, हा आहे ;

**आणि ज्याअर्थी,** नृत्याविष्कार आयोजित करण्यासाठी ज्यांना लायसने देण्यात आली आहेत अशी खाद्यगृहे, परमीट रुम किंवा बिअर बार हे, असभ्य, अश्लील आणि हीन पद्धतीने नृत्याविष्कार करू देत असल्याचे राज्य शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे ;

**आणि ज्याअर्थी,** असे नृत्याविष्कार महिलांच्या शोषणास कारणीभूत ठरत असल्याचेही शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे ;

**आणि ज्याअर्थी,** असे नृत्याविष्कार ज्या पद्धतीने आयोजित केले जात आहेत त्या पद्धतीविषयी अनेक तक्रारी शासनाला प्राप्त झाल्या आहेत ;

**आणि ज्याअर्थी,** खाद्यगृहे, परमीट रुम किंवा बिअर बार यांमध्ये असे नृत्याविष्कार करणे हे महिलांच्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारे असून, त्यामुळे सार्वजनिक नीतिमत्ता अथवा नीतिमूल्ये भ्रष्ट होण्याचा, त्यांचा भंग होण्याचा किंवा त्यांना हानी पोहोचण्याचा संभव आहे असे शासनास वाटते ;

**आणि ज्याअर्थी,** खाद्यगृहांतील, परमीट रुममधील किंवा बिअर बारमधील नृत्याविष्कारांच्या अशा आयोजनांवर बंदी घालणे शासनास इष्ट वाटते ;

**आणि ज्याअर्थी,** उपरोक्त प्रयोजनांसाठी, मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ यामध्ये आणखी सुधारणा करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या छप्पन्नाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :— १९५१ चा मुंबई २२.

संक्षिप्त नाव. **१.** या अधिनियमास मुंबई पोलीस (सुधारणा) अधिनियम, २००५ असे म्हणावे.

सन १९५१ चा मुंबई अधिनियम क्रमांक २२ यामध्ये कलमे ३३क आणि ३३ख समाविष्ट करणे. **२.** मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ याच्या कलम ३३ नंतर पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :— १९५१ चा मुंबई २२.

खाद्यगृह, परमीट रुम किंवा बिअर बार यांमधील नृत्याविष्कारावर बंदी आणि इतर परिणामरूप तरतुदी. " **३३क.** (१) या अधिनियमामध्ये, किंवा, पोलीस आयुक्ताने किंवा जिल्हा दंडाधिकाऱ्याने आपापल्या प्रभारांखालील क्षेत्रांकरिता कलम ३३ च्या पोट-कलम (१) अन्वये केलेल्या नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरीही, मुंबई पोलीस (सुधारणा) अधिनियम, २००५ याच्या प्रारंभाच्या दिनांकास आणि तेव्हापासून,— २००५ चा महा. ३५.

(क) खाद्यगृहामध्ये, परमीट रुममध्ये किंवा बिअर बारमध्ये कोणत्याही तऱ्हेचा किंवा प्रकारचा (of any kind or type) नृत्याविष्कार आयोजित करण्यावर बंदी घालण्यात आली आहे ;

(ख) खाद्यगृहामध्ये, परमीट रुममध्ये किंवा बिअर बारमध्ये कोणत्याही तऱ्हेचा किंवा प्रकारचा नृत्याविष्कार आयोजित करण्यासाठी लायसन प्राधिकारी असलेल्या पोलीस आयुक्ताने, जिल्हा दंडाधिकाऱ्याने किंवा यथास्थिति, इतर कोणत्याही अधिकाऱ्याने, उपरोक्त नियमांन्वये दिलेली सर्व नृत्याविष्कार लायसने रद्द ठरतील.

(२) कलम १३१ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, पोट-कलम (१) चे उल्लंघन करून, खाद्यगृहामध्ये, परमीट रुममध्ये किंवा बिअर बारमध्ये कोणत्याही तऱ्हेचा किंवा प्रकारचा नृत्याविष्कार आयोजित करणाऱ्या किंवा आयोजित करण्याची व्यवस्था करणाऱ्या किंवा आयोजित करण्यास परवानगी देणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस, दोषसिद्धीनंतर, तीन वर्षांपर्यंत असू शकेल इतक्या कारावासाची आणि दोन लाख रुपयांपर्यंत असू शकेल इतक्या दंडाची शिक्षा होईल :

परंतु, न्यायालयाच्या न्यायनिर्णयात नमूद करण्यात येतील अशी, त्याविरुद्ध विशेष व पुरेशी कारणे नसतील तर, अशी कारावासाची शिक्षा तीन महिन्यांहून कमी असणार नाही आणि दंड पन्नास हजार रुपयांहून कमी असणार नाही.

(३) पोट-कलम (१) अन्वये जिचे नृत्याविष्कार लायसन रद्द करण्यात आले आहे अशी कोणतीही व्यक्ती, तिच्या खाद्यगृहात, परमीट रुममध्ये किंवा बिअर बारमध्ये कोणत्याही तऱ्हेचा किंवा प्रकारचा नृत्याविष्कार आयोजित करीत आहे किंवा आयोजित करण्याची व्यवस्था करीत आहे किंवा आयोजित करण्यास परवानगी देत आहे असे, लायसन प्राधिकाऱ्याच्या निदर्शनास आले तर, लायसन प्राधिकारी, कलम ३३ अन्वये तयार केलेल्या नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, खाद्यगृह म्हणून दिलेले नोंदणी प्रमाणपत्र आणि परमीट रुम किंवा बिअर बारला सार्वजनिक करमणुकीची जागा ठेवण्यासाठी दिलेले लायसन (PPEL) निलंबित करील आणि लायसनधारकाला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, ते नोंदणी प्रमाणपत्र आणि लायसन निलंबित केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या कालावधीत एकतर, नोंदणी प्रमाणपत्र आणि लायसन निलंबित करण्याबाबतचा आदेश मागे घेईल किंवा नोंदणी प्रमाणपत्र आणि लायसन रद्द करील.

(४) पोट-कलम (३) अन्वये, नोंदणी प्रमाणपत्र आणि लायसन रद्द करणाऱ्या, लायसन प्राधिकाऱ्याच्या आदेशाने व्यथित झालेल्या व्यक्तीस, आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या कालावधीत राज्य शासनाकडे अपील करता येईल. राज्य शासनाचा त्यावरील निर्णय अंतिम असेल.

(५) पोट-कलम (१) अन्वये जिचे नृत्याविष्कार लायसन रद्द झाले असेल अशा कोणत्याही व्यक्तीस, असे लायसन ज्याने दिले असेल अशा लायसन प्राधिकाऱ्याकडे, योग्य प्रमाणात लायसन फी परत मिळण्यासाठी अर्ज करता येईल. असा लायसन प्राधिकारी, योग्य ती चौकशी केल्यानंतर, असा अर्ज प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या कालावधीत, यथाप्रमाण तत्त्वानुसार लायसन फी परत करील.

(६) या कलमाखाली शिक्षापात्र असलेला अपराध हा, दखलपात्र व अजामीनपात्र असेल.

**३३ख.** या अधिनियमाच्या किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्याच्या अन्य तरतुदींना अधीन राहून, नाट्यगृह, सिनेमागृह, श्रोतृगृह ; अथवा जेथे फक्त त्याच्या सदस्यांनाच प्रवेश आहे अशा खेळाच्या क्लबमध्ये किंवा जिमखान्यामध्ये ; किंवा त्रितारांकित किंवा त्याच्या वरच्या दर्जाच्या हॉटेलमध्ये होणाऱ्या, अथवा (अ) राज्यातील पर्यटनविषयक उपक्रमांना चालना मिळावी म्हणून केंद्र वा राज्य शासन राबवीत असलेले पर्यटन धोरण किंवा (ब) सांस्कृतिक उपक्रम विचारात घेऊन, राज्य शासन यासंदर्भात विशेष वा सर्वसाधारण आदेशाद्वारे विनिर्दिष्ट करील अशा अन्य कोणत्याही आस्थापनेमध्ये किंवा आस्थापनांच्या वर्गामध्ये होणाऱ्या, नृत्याविष्काराच्या आयोजनास, कलम ३३क मधील कोणतीही गोष्ट लागू असणार नाही. विवक्षित प्रकरणांमध्ये कलम ३३क च्या तरतुदी लागू नसणे.

**स्पष्टीकरण.**— या कलमाच्या प्रयोजनासाठी, " खेळाचा क्लब " किंवा " जिमखाना "
१९५० चा मुंबई २९. याचा अर्थ, मुंबई सार्वजनिक विश्वस्तव्यवस्था अधिनियम, १९५० किंवा सोसायटी नोंदणी
१८६० चा २१. अधिनियम, १८६० किंवा कंपनी अधिनियम, १९५६ किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेला इतर कोणताही कायदा यांच्या तरतुदीन्वये, खेळाचा क्लब किंवा जिमखाना म्हणून नोंदणी
१९५६ चा १. करण्यात आलेली आस्थापना, असा आहे. ".

असा. क्र. ८०

रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५



# महाराष्ट्र शासन राजपत्र

असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

रविवार, ऑगस्ट १४, २००५/श्रावण २३, शके १९२७

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग आठ

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधि व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Bombay Police (Amendment) Act, 2005 (Mah. Act No. XXXV of 2005), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. M. SHINDEKAR,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

---

## MAHARASHTRA ACT. No. XXXV OF 2005.

*(First Published, after having received the assent of the Governor in the "Maharashtra Government Gazette", on the 14th August 2005).*

An Act further to amend the Bombay Police Act, 1951.

WHEREAS the Commissioners of Police, District Magistrates and certain other officers, have granted performance licences for holding dance performance;

AND WHEREAS the object of granting such performance licences is to hold such dance performance for public amusement;

AND WHEREAS it is brought to the notice of the State Government that the eating houses, permit rooms or beer bars to whom licenses to hold a dance performance, have been granted are permitting the performance of dances in an indecent, obscene or vulgar manner;



[किंमत : रुपये ९-००]

AND WHEREAS it has also been brought to the notice of the Government that such performance of dances are giving rise to exploitation of women;

AND WHEREAS the Government has received several complaints regarding the manner of holding such dance performances;

AND WHEREAS the Government considers that such performance of dances in the eating houses, permit rooms or beer bars are derogatory to the dignity of women and are likely to deprave, corrupt or injure the public morality or morals;

AND WHEREAS the Government considers it expedient to prohibit such holding of performance of dances in eating houses, permit rooms or beer bars;

AND WHEREAS it is expedient further to amend the Bombay Police Act, 1951, for the purposes aforesaid; it is hereby enacted in the Fifty-sixth Year of the Republic of India as follows:— Bom. XXII of 1951.

Short title. **1.** This Act may be called the Bombay Police (Amendment) Act, 2005.

Insertion of sections 33A and 33B in Bom. XXII of 1951. **2.** After section 33 of the Bombay Police Act, 1951, the following sections shall be inserted, namely :— Bom. XXII of 1951.

Prohibition of performance of dance in eating house, permit room or beer bar and other consequential provisions. "**33A.** (*1*) Notwithstanding anything contained in this Act or the rules made by the Commissioner of Police or the District Magistrate under sub-section (*1*) of section 33 for the area under their respective charges, on and from the date of commencement of the Bombay Police (Amendment) Act, 2005,— Mah. XXXV of 2005.

(*a*) holding of a performance of dance, of any kind or type, in an eating house, permit room or beer bar is prohibited;

(*b*) all performance licences, issued under the aforesaid rules by the Commissioner of Police or the District Magistrate or any other officer, as the case may be, being the Licensing Authority, to hold a dance performance, of any kind or type, in an eating house, permit room or beer bar shall stand cancelled.

(2) Notwithstanding anything contained in section 131, any person who holds or causes or permits to be held a dance performance of any kind or type, in an eating house, permit room or beer bar in contravention of sub-section (*1*), shall, on conviction, be punished with imprisonment for a term which may extend to three years and with fine which may extend to rupees two lakhs :

Provided that, in the absence of special and adequate reasons to the contrary to be mentioned in the judgment of the Court, such imprisonment shall not be less than three months and fine shall not be less than rupees fifty thousand.

(*3*) If it is noticed by the Licensing Authority that any person, whose performance licence has been cancelled under sub-section (*1*), holds or causes to be held or permits to hold a dance performance of any kind or type in his eating house, permit room or beer bar, the Licensing Authority shall, notwithstanding anything contained in the rules framed under section 33, suspend the Certificate of Registration as an eating house and the licence to keep a Place of Public Entertainment (PPEL) issued to a permit room or a beer bar and within a period of 30 days from the date of suspension of the Certificate of Registration and licence, after giving the licensee a reasonable opportunity of being heard, either withdraw the order of suspending the Certificate of Registration and the licence or cancel the Certificate of Registration and the licence.

(*4*) A person aggrieved by an order of the Licensing Authority cancelling the Certificate of Registration and the licence under sub-section (*3*), may, within a period of 30 days from the date of receipt of the order, appeal to the State Government. The decision of the State Government thereon shall be final.

(*5*) Any person whose performance licence stands cancelled under sub-section (*1*), may apply to the Licensing Authority, who has granted such licence, for refund of the proportionate licence fee. The Licensing Authority, after making due inquiry, shall refund the licence fee on *pro-rata* basis, within a period of 30 days from the date of the receipt of such application.

(*6*) The offence punishable under this section shall be cognizable and non-bailable.

**33B.** Subject to the other provisions of this Act, or any other law for the time being in force, nothing in section 33A shall apply to the holding of a dance performance in a drama theatre, cinema theatre and auditorium; or sports club or *gymkhana*, where entry is restricted to its members only, or a three starred or above hotel or in any other establishment or class of establishments, which, having regard to (*a*) the tourism policy of the Central or State Government for promoting the tourism activities in the State; or (*b*) cultural activities, the State Government may, by special or general order, specify in this behalf. Non-application of the provisions of section 33A in certain cases.

Bom. XXIX of 1950. 21 of 1860. 1 of 1956. *Explanation*.—For the purposes of this section, "sports club" or "*gymkhana*" means an establishment registered as such under the provisions of the Bombay Public Trusts Act, 1950, or the Societies Registration Act, 1860 or the Companies Act, 1956, or any other law for the time being in force.".